चतुर्थश्रेणी कर्मचा-यांच्या पदोन्नतीबाबत

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय, क्रमांक-आरटीआर-१०८५/८५३/प्र.क्र. ७२-८५/तेरा,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २९ जून, १९९३.

वाचा-१] शासन निर्णय, क्र.आरटीआर-१०८५/८५३/प्र.क्र.७२-८५/तेरा, दिनांक १५ एप्रिल, १९९१.

शासन निर्णय:- चतुर्थश्रेणी कर्मचा-यांच्या पदोन्नतीबाबतचे आदेश शासन निर्णय, क्रमांक आरटीआर-१०८५/८५३/प्र.क्र.७२-८५/तेरा, दिनांक १५ एप्रिल, १९९१ अन्वये निर्गमित करण्यात आलेले आहेत. सदर आदेशातील [२] संदर्भात वेगवेगळ्या विभागांकडून अशी पृच्छा करण्यात येते की, "चतुर्थश्रेणीतील पात्र कर्मचा-यांना टंकलेखनातील आवश्यक गती [प्र.मि.४० शब्द इंग्रजी किंवा ३० शब्द मराठी] असल्याचे नियमानुसार विहीत केलेले प्रमाणपत्र [गव्हर्नमेंट कमर्शियल सर्टिफिकेट] पुढील एक वर्षात/दोन वर्षात सादर करण्याच्या अटीवर पदोन्नती देण्यात यावी किंवा कसे" या संदर्भात असे स्पष्टीकरण करण्यात येते की, सेवा प्रवेश नियमातील अटींची पूर्तता प्रथमत: होणे आवश्यक असते. यास्तव चतुर्थश्रेणीतील पात्र कर्मचा-यांनी टंकलेखनातील आवश्यक गती असल्याचे नियमानुसार विहीत केलेले प्रमाणपत्र [गव्हर्नमेंट कमर्शियल सर्टिफिकेट] धारण केलेले असेल तरच त्यांना तृतीयश्रेणीत पदोन्नती देण्यात यावी.

२. त्याचप्रमाणे असेही स्पष्ट करण्यात येते की, चतुर्थश्रेणीतील कर्मचा-यांची वर्ग-४ मधून वर्ग-३ मध्ये पदोन्नती देण्यापूर्वी, वर्ग-४ मधील पदावर नियमित स्वरुपात अखंडित तीन वर्षे सेवा होणे आवश्यक आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

य.कि.चौधरी
[य.कि.चौधरी]
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे सचिव,
प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई,

[कृ.मा.प.]

* प्रबंधक, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई,
* प्रबंधक, लोकायुक्त व उप लोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, [विधानसभा/विधानपरिषद], मुंबई,

महालेखापाल-१ [लेखा परीक्षा], महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल-२[लेखा परीक्षा], महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल-१[लेखा व अनुज्ञेयता], महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-२[लेखा व अनुज्ञेयता], महाराष्ट्र, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालयाच्या विविध विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभागप्रमुख
व कार्यालय प्रमुख.

[* - पत्राने ]